


# भावी आयुष्य

## सुखमय करण्याची

## तरुण पिढीवर असलेली

## जबाबदारी.

कुमारी मथुराबाई जोशी.

# भावी आयुष्य सुखमय

करण्याची

## तरुण पिढीवर असलेली

## जबाबदारी.

कुमारी मथुराबाई मोरेश्वर जोशी

यांनीं

डेक्कन कॉलेजांत दिलेलें व्याख्यान.

पुणें येथें

आर्यभूषण छापखान्यांत छापिलें.



१९१२.

किंमत २ आणे.



श्री.

# अर्पणपत्रिका.



हें लहानसें पुस्तक माझ्या सर्व तरुण
बंधुभगिनींस अत्यादरपूर्वक अर्पण
केलें आहे.

**ग्रंथकर्त्री.**




# प्रस्तावना.

प्रस्तुत भाषण मीं ता. २१ सप्टेंबर १९१२ रोजीं पुणें येथील डेक्कन कॉलेजांत ' डिबेटिंग युनियन ' तर्फे झालेल्या व्याख्यानमालेंत श्री. सौ. काशीबाई कानिटकर यांच्या अध्यक्षतेखालीं केलें होतें. त्यानंतर प्रथम तें पुणें येथील ' दैनिक ज्ञानप्रकाशां'त सविस्तर प्रसिद्ध झालें.

हें व्याख्यान पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाल्यास तरुण पिढीला फारच उपयुक्त होईल अशी बऱ्याच सन्मान्य बंधुभगिनींनीं सूचना केल्यामुळें तें आतां स्वतंत्र रीतीनें प्रसिद्ध करण्यांत येत आहे. यांतील विचारांस अनुसरून तरुण मंडळींनीं आपल्यावरची जबाबदारी ओळखण्याचा थोडा जरी प्रयत्न केला तरी माझ्या श्रमाचें सार्थक झालेंसें मला वाटेल.

पीसकॉटेज–सातारा,
ता. ६ माहे डिसेंबर १९१२.

**मथुराबाई मोरेश्वर जोशी.**

# भावी आयुष्य सुखमय

## करण्याची

# तरुण पिढीवर असलेली

# जबाबदारी.

**अध्यक्षबाई व प्रिय बांधव हो !**

आज आपणांपुढें ' भावी आयुष्य सुखमय करण्याची तरुण पिढीवर असलेली जबाबदारी ' हा विषय आहे. यासंबंधीं अश्रुतपूर्व म्हणजे मी आपणांस कांहीं माहिती देणार आहें असें नाहीं. आजपर्यंत कित्येक विद्वान् स्त्रीपुरुषांचे व आपल्या पूज्य गुरुवर्यांचे उपदेश आपण आपल्या हृत्पटलावर कोरून ठेविलेले असतील आणि आपलें सर्व आयुष्य जर या ठिकाणींच जावयाचें असतें तर मग सांगावयाचें विशेष कांहीं उरलेंही नसतें. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. बहिणीच्या मनास ज्ञानानें प्रगल्भ दशा आलेली नसली तरी तिच्या कळकळीकडे लक्ष पुरवून सहृदय बंधु तिचें म्हणणें ऐकून घेतो त्याप्रमाणें आपली भगिनी म्हणून जें हितगुज मी आपणांस निवेदन करणार

आहे तें आपण शांतचित्तें श्रवण कराल अशी मला आशा आहे.

तरुण पिढीला विविध प्रकारचीं कर्तव्यें आहेत. त्यांत कौटुंबिक, नैतिक, सामाजिक, राजकीय व धार्मिक अशीं मुख्य आहेत. परंतु आपलें जीवित सुखमय कसें होईल, हा सर्वांत विचारार्ह प्रश्न आहे व त्याचें उत्तर तितकेंच व्यापक आहे. कारण स्वतःच्या मनास आनंद व सुख असलें तरच जगांत वागणें सौख्यकारक वाटणार. ज्या कोणांशीं म्हणून बोलण्याचा प्रसंग येतो त्यांचे मतें आपणाला गृहसौख्य नाहीं असें म्हणणें पडतें. प्रत्येकाची तीच कुरकुर कां असावी, याचा विचार केला म्हणजे पुरुषांचें जीवित सुखमय करणें जिच्या पूर्णपणें स्वाधीन त्या पत्नीचा दोष असला पाहिजे असें सहजच मनांत येतें. कॉलेजांत असतांना किंवा कॉलेज सोडतांना भावी आयुष्य कसें जाणार, यासंबंधीं विद्यार्थ्यांच्या मनांत विचार येऊं लागतात. जशी ज्यांची परिस्थिति असेल तसा त्यांचा आयुष्यक्रम होणार हें तर निर्विवाद आह. विशेषतः गृह सौख्यमय करण्याची गुरुकिल्ली ज्या पत्नीजवळ असते तिच्या योग्यतेवर सर्वस्वी भावी जीवित अवलंबून असावयाचें. तेव्हां तिच्यासंबंधीं विचार केला पाहिजे, परंतु तो करण्यापूर्वीं प्रथम आपल्या गृहस्थितीसंबंधीं विचार करूं.

आतां, सांप्रतची आपल्या समाजाची व्यवस्था पाहिली असतां अविभक्त कुटुंबपद्धतिच आपल्यांत प्रचलीत असलेली दिसून येते. याविषयीं स्थूलमानानें विचार केला असतां नफे त्याचप्रमाणें तोटेही आहेत. परंतु नफ्यापेक्षां तोटे अधिक आहेत असेंच म्हटलें पाहिजे. अविभक्त कुटुंबामध्यें परस्परांविषयीं प्रेमभाव असतो. कुटुंबांतील एकाच व्यक्तीवर सर्व भरिभार असल्यामुळें दुसऱ्या कोणास प्रपंचाची काळजी वहावी लागत नाहीं. एखादा निरुद्योगी राहिला तरी त्याला उपवासी रहाण्याची पाळी येत नाहीं. परतंत्रतेची संवय झाल्यामुळें आज्ञाधारकता हा गुण वसतो. एकाच्या सदाचरणाचा कित्ता दुसरा वळवितो. परस्परांस मदत होते. श्रमविभाग होऊन फल मोठें मिळतें, खर्चही काटकसरीनें होतो, असे फायदे एकत्र राहिल्यानें होतात, नाहीं असें नाहीं. तथापि अशा स्थितींत कौटुंबिक सौख्य किती मिळत असेल हें ज्याचें त्यासच माहीत ! कारण एकत्र अक्षयीं वास्तव्य झाल्यानें बंधुबंधूंमध्यें, पितापुत्रांमध्यें, सास्वासुनांमध्यें, जावाजावांमध्यें, कलह उत्पन्न होण्याचे अनेक प्रसंग येतात व कुटुंबाचा मुख्य पुरुष विशेषतः त्याची पत्नी जर शहाणी नसली तर असले प्रसंग अव्याहत चालतात. वास्तविक घरांत ऐक्य व प्रेमभाव हीं दिसावीं, परंतु यांच्या अभावीं परस्परांचीं मनें शुद्ध न रहातां एकमेकांविषयीं विटून जातात. स्त्रियांच्या अन्तर्यामीं वसणारा

कलहाग्नि आंतल्या आंत धुमसून स्फुलिंगरूपानें बाहेर पडतो व मत्सरभाव व्यक्त होतो. दुसरें मोठें अनहित असें होतें कीं, निरुद्योगीपणा यदृच्छेनें वाढतो. कुटुंबांतील कर्ता पुरुष-पिता, बधु, चुलता जो कोणी असेल तो--अन्नूस मिळून सर्वांचें पोषण करतो, परंतु त्याला चिंतारूपी रोग रात्रंदिन त्रास देत असतो. एखादा मुलगा दुर्वर्तनी निपजला तर त्याचेंही प्रायश्चित्त बाकीच्यांस भोगणें प्राप्त होतें. अशी स्थिति दिसून येते. विशेष महत्वाचा दुसरा तोटा हा आहे कीं, अविभक्त स्थितींत स्वावलंबन व विचार-स्वातंत्र्य, या दोन गुणांचा विकास बिलकुल होत नाहीं. कारण मुलांच्या मनांत पुष्कळ गोष्टींविषयीं उच्च कल्पना आल्या तरी उत्साह प्रकट करतां येत नाहीं. स्वतंत्र असतांना बुद्धीचा विकास करण्यास जितकी सवड सांपडते तितकी परतंत्र स्थितींत नसते. मोठ्या प्रौढ झालेल्या मुलांची स्थिति बरेच अंशीं नोकरांसारखी असते. आपले जे वरिष्ठ असतील त्यांना प्रिय असलेल्या मतांप्रमाणें वागण्यास नोकरांस स्वतंत्रता असते, परंतु ज्या गोष्टी त्यांना आवडत नाहींत त्यांसंबंधीं सावधगिरीनेंच वागणें जरूर असतें. व्यर्थ विरुद्ध जाऊन इतराजी कां करून घ्या ? अशा विचारांनीं आपल्या कल्पनांस फांटा द्यावा लागतो.

एकत्र असल्यानें थोडक्यांत चरितार्थ चालवितां येतो व गरजाही भागतात, ही गोष्ट सत्य आहे. कारण वेगळा

संसार म्हणजे खर्च तितका जास्त लागतोच, परंतु ही स्थिति कांहीं अनिष्ट नाहीं. केव्हां केव्हां पुढील प्रजा अर्थार्जन करण्यास निरुपयोगी असल्यामुळें कर्त्या पुरुषांना नातवंडापर्यंत लग्नें मुंजी करण्याचा प्रसंग येतो. पुष्कळ वेळां असें घडतें कीं, बापाच्या अमदानींत जो मुलगा निरुद्योगीपणांत दिवस घालवितो व संपत्तींत लोळत असतो तोच ती स्थिति बदलतांच अत्यंत विपन्नावस्थेस येतो. हीं दोन्हीही वाईटच. निर्वाह थोडक्यांत झाला म्हणजे त्यांत मोठा पुरुषार्थ आहे असें नाहीं. जों जों अधिक श्रम करण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति होते तों तों राष्ट्राचें पाऊल पुढेंच पडतें हें विसरतां कामा नये.

समाजाची प्रस्तुत व्यवस्था एकदम बदलून टाकणें हें कोणाच्याही स्वाधीन नाहीं. अविभक्त स्थितींत तोटे आहेत हें जरी आपणास दिसत असलें तथापि प्राप्त स्थितींत मनाचें समाधान करून घेण्यास अंतर्व्यवस्थेंत इष्ट ते फेरफार करणें जरूर आहे व असे फेरफार करण्यास अंतर्व्यवस्थेचीं सूत्र ज्या स्त्रियांच्या स्वाधीन आहेत त्यांच्या स्थितींत सुधारणा प्रथम झाली पाहिजे. स्त्रियांच्या स्थितींत सुधारणा करण्यापूर्वी त्यांच्यावर वैवाहिक अवस्थेचा बोजा जो त्यांच्या संमतीविना लादला जातो त्याबद्दल विचार करणें अत्यावश्यक आहे.

लग्नाचा उद्देश समाजाचें अस्तित्व अबाधित व चिर-

काल रहावें हा आहे व तें कायम ठेवण्यास लग्नपद्धति पाहिजे आहे. ही गोष्ट सत्य. परंतु त्यामध्यें क्रांति होणें जरूर आहे. Dr. Mary Wood Allen, M. D. यांनीं म्हटलें आहे कीं:—

"The youth of to-day have in their own hands the moulding of the future, not only of themselves but of the nation, by the every-day habit of their lives."

म्हणजे "आपल्या आयुष्यांतील रोजच्या संवयींच्या योगें केवळ आपल्या स्वतःच्याच नव्हे तर आपल्या राष्ट्राच्याही भावि स्थितीला अमुक एक प्रकारचें वळण लावणें ही गोष्ट आजच्या तरुण पिढीच्याच सर्वस्वीं स्वाधीन आहे." यावरून तरुण पिढीवर केवढी महत्वाची जबाबदारी आहे हें सहज सुव्यक्त होतें.

गृहस्थाश्रम स्वीकारणें जरी चांगली गोष्ट असली तरी ती वास्तविक आयुष्याची इतिकर्तव्यता नाहीं. प्रस्तुत मुलांमुलींच्या अंतःकरणांवर विवाहविषयक विचारांचें बीज पूर्णपणें रुजलें गेलेल असल्यामुळें ब्रह्मचर्याच्या महत्वाविषयीं कल्पनाही त्यांच्या मनाला शिवत नाहीं. वास्तविक भावि पिढीच्या उन्नतीचा पाया या ब्रह्मचर्यांत घातला जातो. मागील काळीं याच भरतखंडांत पाणिनि, वाल्मीकि, कालिदास, भास्कराचार्य, गदाधरभट्ट, असे असंख्य महात्मे

निपजलेना ? तसेंच विक्रमादित्य, इतिहासप्रसिद्ध शिवाजी-महाराज, बाजीराव, यशवंतराव, रणजितसिंग, असे तलवार-बहाद्दर अवतीर्ण झाले. तुकाराम, रामदास, ज्ञानेश्वर, एक-नाथ असे पुण्यशील महात्मे होऊन गेले. त्याच या आर्या-वर्तांत पूर्वजांचें स्मरण करून देणारें एकही मानवरत्न चमकूं नये काय ? आमच्यांत जे कांहीं दोष उत्पन्न झाले आहेत त्यांत ब्रह्मचर्याचा लोप यास अग्रस्थान दिलें पा-हिजे. आमच्या पूर्वजांकडून जीं कांहीं असामान्य म्हणून कामें झालीं तीं ब्रह्मचर्यव्रत उत्तम प्रकारें पाळल्यामुळें त्यां-च्यांत जें कांहीं सामर्थ्य उत्पन्न झालें होतें त्यामुळेंच झालीं. " Sound mind in a sound body " हें तत्व पूर्व-कालीन लोकांच्या मनावर चांगल्या प्रकारें ठसलें गेल्या-मुळें तरुणपणांत व्रतस्थ राहून ते शारीरिक संपत्ति मिळ-वीत होते. ब्रह्मचर्याच्या ऱ्हासानें देशाची अवनति कशी होते, याचें उदाहरण पहाण्यास लांब जाव-यास नको. नेटानें व निग्रहानें काम करणारीं माणसें आज किती आहेत ? करारीपणा, निश्चयीपणा व उत्कृष्ट मनोनिग्रह आज दिसून येत नाहीं. साहसाच्या नुसत्या कल्पनेनें शरीरावर रोमांच उभे रहात आहेत, या गोष्टी कशाच्या निदर्शक आहेत ? पूर्वकाळीं मुलाला ८ वर्षांपासून २५ वर्षांपर्यंत गुरुगृहीं रहावें लागे. एवढ्या काळांत धर्मनीति षट्शास्त्रें वगैरेंचा अभ्यास करून

१४ विद्या व ६४ कला यांत पारंगत व्हावें लागे. शिवाय ब्रह्मचर्यव्रतही कडकडीत पाळावें लागे. म्हणून शरीराची पूर्ण वाढ होण्यास अवकाश सांपडत असे. हल्लीं कालमाना-प्रमाणें पूर्वीचें कांहीं राहिलें नाहीं. नाहीं म्हणावयाला अलीकडे हरिद्वार येथें स्थापन झालेल्या 'ऋषिकुल' व 'गुरुकुल' या संस्था मागील काळचें स्मरण करून देतात. हल्लीं शालागृहें जरीं गुरुगृहांच्या ठिकाणीं आहेत तरी शिक्षण नुसतें एकदेशी मिळत आहे. शाळागृहां-तून शिक्षणक्रम आटोपून बाहेर पडलेलीं मुलें जोमदार न दिसतां अगदीं बलहीन दिसतात याचें कारण काय ? तर विद्यार्थिदशा संपण्यापूर्वी आमच्या मुलांना जनकाची पदवी प्राप्त होऊन दोन पैसे मिळविण्याचें सामर्थ्य येण्यापूर्वीच मुलींचीं लग्नें व मुलांच्या मुंजी करण्याची वेळ येते. बनारस येथील सेंट्रल हिंदु कॉलेजमध्यें विवाहित मुलगाच मुळीं दाखल करीत नाहींत, असें माझ्या ऐकिवांत आहे. त्याचप्रमाणें येथील 'महिलाविद्यालयांत' ब्रह्मचर्य फंडांतून शिकणाऱ्या प्रत्येक कुमारिकेच्या पालकाकडून तिचें २० वर्षांपर्यंत लग्न करण्यांत येणार नाहीं अशी अट लिहून घेतली जाते. यावरून ब्रह्मचर्याची महती आपणांस कळून येईल. परंतु नुसती अविवाहित स्थितीही उपयोगी नाहीं तर त्यांत शृंगारपूर्ण नाटकें कादंबऱ्या यांचेंही वाचन नसावें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे शारीरिक ब्रह्म-

चर्याबरोबर मानसिक ब्रह्मचर्यही यथायोग्य पाळिलें पाहिजे. गृहस्थाश्रमांत प्रवेश करण्यापूर्वी पूर्वतयारी म्हणजे, पवित्राचरणानें वीर्याचें रक्षण, शरीर कणखर, सर्वावयव परिपक्क, मन निर्मल, शांत व तें सुविचारांनीं परिपूर्ण ठेवणें हीं होय. गृहस्थाश्रम स्वीकारण्यास खरा व योग्य काळ मुलींना १६ वषापुढें व मुलांना २० वर्षा-पुढें युक्त आहे.

सगळ्या ऐहिक सुखांचा आधार जरी लग्नावर आहे तरी योग्यप्रकारें झालेला विवाहच इहलोकींच्या सुखांतील परम सुख मानलें जातें. विवाहसंबंध जडल्यावर उभय-पक्ष परस्परांशीं पवित्रतेनें वतू लागले तर त्याचा परिणाम कांहीं अपूर्व होतो. संसारसुखाचा लाभ घेत असतां ज्यांत स्वार्थ व परमार्थ दोन्ही साधतात असें जर कोणतें स्थान असेल तर तें गृहस्थाश्रमच होय. कौमार्यावस्थेंत उत्तम प्रकारें ब्रह्मचर्य जर पाळण्यांत आलें तर ज्या अनेक सद्गुणांचें, प्रेमाचें व अभिमानाचें बीजारोपण मनोपवनांत झालेलें असतें त्यांस अभ्यासाचें उदक मिळून बनलेल्या सुंदर वृक्षाच्या मनोरम व रुचिर फलपुष्पांचा आस्वाद गृहस्थाश्रमांत आल्हादयुक्त मनानें घेतां येतो. ब्रह्मचर्यव्रताचा उपक्रम जरी बाळपणीं करावयाचा असतो तरी त्याचें योग्य नियम आणि अवश्य कर्तव्यें हीं गृहस्थाश्रमांतच पाळावीं लागतात.

Dr. Stall यांनें 'What a young man ought to be' यांत म्हटलें आहे:–

"Remember that a marriage is not for a day or year, not simply for the period of prosperity but for life, for the time of adversity when in the darkness you will need somebody to stand by you, that each may be to the other, an inspiration, a help and a stay."

म्हणजे "लग्नानें स्त्रीपुरुषांच्या ज्या गांठी पडत असतात त्या एका दिवसापुरत्या, वर्षापुरत्या अथवा आपल्या सुखाच्या दिवसापुरत्याच केवळ नसून त्या जन्माच्या पडत असतात. विपत्कालीं आणि संकटसमयीं कोणी तरी आपल्या जिव्हाळ्याचा आपल्याजवळ असावा लागतो एतदर्थ त्या गांठी पडत असतात; व पाडावयाच्याही असतात, व त्याही अशाकरितां कीं, परस्परांकडून परस्परांस स्फूर्ति, साहाय्य आणि सुख मिळावें म्हणून."

विवाहामुळें पतीच्या स्वाभाविक सद्गुणांत जर कांहीं कलंक असला तर तो नष्ट करण्यास भार्येचा सहवासच कारणीभूत होतो. तसेंच पत्नीचा जो नाजुक व केव्हां केव्हां विकारवश बनणारा स्वभाव असतो तो बदलून विचारस्थैर्य येण्यास पतीचा सहवास कारणीभूत होत असतो.

परंतु वधूवरांचे स्वभाव एकमेकांस पटण्यास व त्यांचें

जीवैक्य होण्यास त्यांचे प्रौढपणीं विवाह झाले पाहिजेत. प्रस्तुतची आमच्या समाजाची स्थिति पाहिली तर कांहीं अपवाद खेरीजकरून बाकी सर्वत्र बालविवाहच होत आहेत. ते जोंपर्यंत नष्ट होणार नाहींत तोंपर्यंत समाजाची अवनत स्थिति कमी होणें शक्य नाहीं.

जोंपर्यंत बालविवाह प्रचलित आहेत तोंपर्यंत हुंड्याची चाल सुद्धां नष्ट होणें नाहीं. कारण स्वतः मुलीस कांहींच मूल्य नसून तिची किंमत हुंड्यावर ठरविली जाते. यास आळा घालणें सुद्धां तरुणांकडे आहे. हुंड्याच्या चालीमुळें कांहीं कांहीं पोटजातींतून मुलींना आजन्म अविवाहित रहाण्याची पाळी येते. कित्येक वेळां मुली आत्महत्या करण्यासही प्रवृत्त होतात, ही किती शोचनीय गोष्ट आहे बरें ? अशा वेळीं विवाहेच्छु तरुणांनीं निग्रह करून आपल्या आईबापांना असल्या प्रकारांपासून परावृत्त केलें पाहिजे. तरच कांहीं उपाय आहे. नुकताच "Times of India Illustrated Weekly" मध्यें "Practical Social Reform" या सदराखालीं थोडासा मजकूर वाचण्यांत आला होता तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे, तो असाः–

"The *Nobo Banga* writes that Dr. Prabodh Kumar Basu, L. M. S., has set an example to young Benyal by returning Rs. 900 to the bride's party on the occasion of his wed-

ding which came off lately. It appeared that his mother had accepted the sum from the bride's people as dowry for her son. But when the hour for the marriage ceremony to be performed came he urged that he would be no party to the marriage if the dowry were not returned. He had signed a pledge, along with other young men, not to take a pice from the bride's party. His father-in-law at first hesitated to take back the money saying, "How can I take back what I gave for my son-in-law?" But seeing that the marriage depended on the withdrawal, which his would-be son-in-law proposed as the absolute condition, he yeilded at last. The ceremony was then performed."

किती हें हृदयंगम आहे नाहीं बरें ? अलीकडे मुलांची किंमत परीक्षांवर ठरून गेल्यासारखी झाली आहे. एक परीक्षा उतरली कीं ५०० चा आंकडा त्यांच्या गळ्यांत पडतो व लग्नसराईमध्यें विक्रीसारखा प्रकार चालतो. प्रत्येक परीक्षेबरोबर हें हुंडयाचें प्रमाण वाढत जातें. बरें, एव-ढ्यानें तरी वरपक्षाची संतुष्टता होते असें नव्हे तर कांहींना कांहीं कारणांनीं कलह होऊन हास्यास्पद प्रकार घडून लग्नें सुखास्पद व्हावयाचीं तीं न होतां स्त्रियांच्या अज्ञाना-मुळें चिरशत्रुत्व संपादन केलें जातें व यांचे परिणाम वधू-

वरांस भोगावें लागतात. या गोष्टी तरुणांस कळत नसतात असें नाहीं, परंतु ते डोळेझांक करतात किंवा त्यांना करणें भाग पडते. या हुंड्याच्या चालीमुळें, समजा एखादा पिता गरीब आहे व त्याला ५।६ कन्या आहेत तर त्यांना त्यानें मिळतील तशा वरांना देऊन मोकळें झालें पाहिजे, विहिरींत ढकललें पाहिजे. किंवा ग्रामत्याग तरी केला पाहिजे. त्यांच्या विपत्तीची कल्पना तुम्हां तरुणानांच असली पाहिजे. यामुळें सद्गुणांची किंमत होत नाहीं. विजोड संबंध जडतात. वास्तविक 'सोय जाणे तो सोयरा' असें म्हटलेलें आहे परंतु सोयरे म्हणजे परस्परांचे रिपु होतात. याशिवाय मंगलकार्यांतून होणारे नायकिणींचे नाच यांना अजीबात फांटा दिला पाहिजे. हें काम तरुण पिढींचेंच आहे. थोडासा निग्रह व नेट अंगीं असला म्हणजे झालें. ज्या समयीं दोन जीवात्मे परस्परांशीं संलग्न होतात, अशा पवित्र प्रसंगीं पतित जनांचें दर्शन किती त्याज्य समजलें पाहिजे ? परंतु नाहीं--यास तर प्रमुखस्थान ! गवयांचें गाणें नाहींतर अलीकडे निघालेले ग्रामोफोन यांचा उपयोग अशा वेळीं अत्यंत आल्हादकारक होईल. ज्यांचे विवाह होऊन चुकले आहेत, त्यांच्या स्वतःच्या नाहीं, परंतु, बंधु, आप्त गणगोत यांच्या विवाहप्रसंगीं त्यांनीं ही चाल प्रचारांत आणावी व ज्यांचे विवाह होणें असतील त्यांनीं प्रथम स्वतःच्या लग्नांत हा हेका

अवश्य धरावा. लग्नांतील दुसऱ्या अशा कित्येक चाली व प्रकार आहेत. परंतु विनाकारण विस्तारभयास्तव मी सांगत नाहीं. तथापि आठ आठ दिवस जेवणावळींत जो निरर्थक खर्च होत असतो त्याचा उपयोग कांहीं होत नाहीं. वास्तविक लग्नाचा विधि किती थोडा व त्याचें खर्चाचें स्वरूप किती मोठें? त्यामुळें खरें सौख्य कोणासच वाटत नाहीं. रात्रंदिन खटाटोप व व्याह्याजांवयांची मनधरणी-लग्नसमारंभाला फार बेताचें स्वरूप आलें पाहिजे. यांत बालवधूवरांना तर त्यांच्यावर केवढी मोठी जबाबदारी टाकली जाते याची बिलकुल कल्पना नसते. लग्न म्हणजे चार दिवस गडबडींत आनंदांत जातात, वाजंत्रीं वाजतात, एवढाच इत्यर्थ तीं काढतात. टिपण पहाण्याच्या व ३६ गुण जमविण्याच्या खटपटींत पडल्यामुळें कित्येक वेळां विजोड संबंध होऊन ३६ चा आंकडा पडतो. कांहीं संबंध तर आजन्म पश्चात्तापास कारणीभूत होत असतात. लहान १०।१२ वर्षांच्या मुलींच्या हातांत जर पुरुष आपलें जीवित देऊन बसतात तर तें सुखमय झालें नाहीं तर नवल काय ? आमच्यांत कित्येक वधूवरांचें दर्शन प्रथम विवाहसमयींच होतें. कोणाचें जरी अगोदर झालें तरी सहवासानें जशा कित्येक बारीकसारीक गोष्टी-स्वभाव-कळतात त्या समजण्यास मार्ग नाहींच. मुलांचे बालविवाह होतात असें आजच्या

घटकेस विशेष प्रकारें म्हणतां येणार नाहीं. मुलगे प्रौढ होतात, परंतु मुलींचें वय त्या मानानें बरेंच कमी असल्यामुळें विषमविवाह होतात. बालविवाह शास्त्रसंमत नाहीं, हें तर सिद्ध झाललेंच आहे. त्यापासून शारीरिक र्‍हास व राष्ट्रीय अवनति हीं तर होतातच; परंतु सामाजिक अनहितही कित्येक प्रकारांनीं होतें. त्यांपैकीं पहिलें:—

अकालीं मातृपद प्राप्त झाल्यामुळें लहान मुलांचें संगोपन अज्ञ बालिकांना करण्याचा प्रसंग येतो. त्यांच्या ठिकाणीं योग्य तो मनोनिग्रह नसल्यामुळें मुलांची आबळ होते. युरोपियन लोकांच्या मुलांची आपल्या मुलांशीं जर तुलना केली तर जमीनअस्मानाचा फरक दृष्टींस पडतो. आमच्यांतील मुलें जोमदार व मांसल न दिसतां अशक्त व फिकटलेलीं दिसतात. गतवर्षीं झालेल्या खानेसुमारीवरून ५–१५ वर्षांच्या मुलींच्या मृत्युसंख्येचें प्रमाण मुलांपेक्षां जास्त आढळलें. हा बालविवाहाचा परिणाम आहे.

दुसरें अनहित असें आहे कीं, मुलांच्या व मुलींच्या उभयतांच्या शिक्षणांत बालविवाहामुळें व्यत्यय येतो एकदां विवाहशृंखला पायांत पडली कीं मुलांचे विचार निसर्गतः त्या बाजूला वळतात व त्यांच्या मनाची एकतानता नष्ट होते. मला असें एक उदाहरण माहीत आहे कीं, २१ वर्षांच्या अवधींत २।३ मुलें झालेलीं तशांत बालपत्नीचा व त्या अर्भकांचा अजारीपणा, यामुळें एका

तरुणास उच्च शिक्षणास अजीबात फांटा द्यावा लागून कॉलेज सोडावें लागलें. अशीं आणखी ही कित्येक उदाहरणें असतील. मुलींची स्थिति तर याहूनही शोचनीय आहे. त्यांना १०।१२ वर्षांच्या अवधींतच शाळेला रजा द्यावी लागते व तेथेंच त्यांच्या शिक्षणक्रमाचा अंत होतो. एवढ्या अवधींत कितीशी ज्ञानप्राप्ति होणार ? विवाहानंतर पतीनें कितीही निश्चय केला तरी परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळें अभ्यास वाढणें शक्य नसतें. शिवाय या वयांत मुलगे बहुतेक कॉलेजांत, व मुलींचें सासर व माहेर, मंगळागौरी व महालक्ष्म्या यांत वेळ जात असतो. मग पतिपत्नीचा परिचय होण्यास अवकाश कोठें सांपडतो ? मुलें झाल्यावर सुद्धां पुरुषांनीं नेटाने अभ्यास करून सिद्धि मिळविल्याचीं व लहानपणीं अक्षरशत्रु असलेल्या स्त्रियांनीं विवाह झाल्यावर विद्वान् होऊन देशास ललामभूत झाल्याचीं उदाहरणें आहेत, नाहींत असें नाहीं. परंतु तीं अपवादादाखलच समजावयाचीं.

बालविवाहामुळें तिसरें अनहित म्हटलें म्हणजे हें कीं, त्याचा हिंदुलोकांच्या स्वभावावर दुष्परिणाम झालेला आहे. लहानपणीं विवाह झालेल्या मुलांची पराक्रमाकडे प्रवृत्ति होत नाहीं. एरोप्लेनमध्यें निर्भयपणें बसणें, ध्रवाचा शोध लावण्याचा प्रयत्न, कांचेच्या तळाच्या बोटींत बसून समुद्रांतील चमत्कार पहाणें किंवा पाण्याखालून चालणाऱ्या

आगबोटींतून प्रवास करणें हीं धाडसाचीं कामें करण्यास असल्या मुलांचें मन घेत नाहीं, उलट आपल्या पत्नीचें व लहान मुलांचें कसें होईल ही चिंता सदैव त्यांच्या मनाला असते. बालविवाहामुळें मुलांना आपल्या आयुष्यांत कांहीं मजा वाटेनाशी होऊन तीं अद्वितीयताशून्य बनतात. ज्या वयांत अंगांत जोम रसरसलेला असावयाचा त्याच वयांत निराशेचें साम्राज्य पसरणें किती घातुक आहे! कूपमंडूकासारखी वृत्ति पिढ्यानुपिढ्या चालत आल्यामुळें इतकी दृढ झालेली आहे कीं, हिंदु लोक हे भित्रे अशी इतर लोकांची पक्की समजूत होऊन बसलेली आहे. बालविवाहामुळें स्त्रियासुद्धां स्वावलंबनविरहित व स्वतंत्रताशून्य झालेल्या आहेत. या गुणांचा विकास होण्यास मुळीं अवसरच सांपडत नाहीं. कारण त्यापूर्वींच त्यांचें लग्न होऊन त्या सासुरवास भोगूं लागतात. हिंदु स्त्रिया अतिशय विनयशील व असल्या स्थितींत संतोष मानणाऱ्या अशी सर्वजण स्तुति करतात. परंतु त्यामुळें समाजोत्कर्ष होत नसून उलट अवनति होत आहे. बालविवाहामुळें आयुर्मर्यादाही कमी होते. मागच्या पिढींत जरी बालविवाह झाले असले, तरी बालमातापितरें अशी संज्ञा नव्हती, परंतु आतां ती असल्यामुळें ही अनिष्ट स्थिति झाली आहे.

बालविवाहाचा चवथा, सर्वांत भयंकर व काळजास

घरे पाडणारा परिणाम म्हटला म्हणजे बालगतभर्तृकांची संख्या तयार होणें हा होय. प्रौढगतभर्तृकांना आपल्या पतिसमवेत घालविलेल्या सुखकर दिवसांचें स्मरण करून तरी दुःखांत किंचित् सुख मानतां येईल, परंतु बालगतभर्तृकांना आपले दिवस कंठणें मोठें कठीण जातें! कारण त्यांचें जीवित कुमारिकांप्रमाणें असल्यामुळें आपणांवर रूढीचा जुलूम कां होतो आह व तिचें दास्यत्व कां पत्करून रहावें हें कांहींच कळत नसल्यामुळें त्यांची स्थिति अनुकंपनीय होऊन जाते! किती तरी स्त्रियांना अशा रीतीनें आपलें जीवित दुःसह झालें आहे! असो.

आतां स्त्रिया वैवाहिक आयुष्यक्रम कंठीत असतांनासुद्धां त्यांच्या स्थितीविषयीं जीं कांहीं सामाजिक मतें आहेत त्यांबद्दल विचार केला कीं, त्यांना गुलामांप्रमाणें वागविण्याची जी रीत होती त्यांत म्हणजे विशेष फरक झाला आहे, असें दिसून येणार नाहीं. कारण उत्तम स्त्री म्हटली म्हणजे अतिशय नम्रता, पतीच्या अर्ध्या वचनांत सदैव रहाणें, आपल्या भर्त्याव्यतिरिक्त अन्य कोणत्याही गोष्टींत सौख्य न वाटण्याची बुद्धि, पतिसेवेंत सदैव तत्परता, पतीची आज्ञा सदैव शिरसावंद्य मानणें, प्रसंगीं पतीकरितां स्वतःच्या प्राणाची पर्वा न करणें, त्याच्या सुखाविषयीं अगोदर विचार करून त्याच्याविषयीं अनन्य भक्ति व परम प्रीति ठेवणें हीं लक्षणें तिचीं मानलीं जा-

तात. परंतु उलटपक्षीं पतीवर तितक्याच महत्वाची जबाबदारी पडते. पति सुशील स्वभावाचा व पत्नी तामसी वृत्तीची किंवा आज्ञाधारक नसली तरी कुटुंबसुखाचा नाश होतोच किंवा उलट स्थिति म्हणजे पत्नी सुशील व गोड स्वभावाची परंतु पतीची वृत्ति करमणुकीच्या चालू कादंबरीमधील ‘ मायेच्या बाजारांतील’ल अण्णासाहेबाप्रमाणें असली ह्मणजे शेवट पद्मातांईसारखाच व्हावयाचा ! आणि अशीं उदाहरणें किती तरी असतील ?

तरुण पिढीला सुख प्राप्त करून घेण्याची महत्वाची जबाबदारी ह्मटली ह्मणजे गृहस्थाश्रमी होण्यापूर्वीं त्या आश्रमास योग्य अशी आपली स्वतःची तयारी आहे कीं नाहीं हें पाहणें ही होय. कारण राष्ट्राची भावि उन्नति आज आपणांवर अवलंबून आहे. मातापितर हे आपल्या बालकांच्या नुसत्या शरीराचे जन्मदाते नाहींत परंतु त्यांच्याठायीं वसत असलेले मानसिक आणि नैतिक गुणसुद्धां ते त्यांना प्रदान करीत असतात. ही गोष्ट ह्मणजे बुद्धिवैभवशाली मनुष्यप्राण्याला कळत नाहीं असें थोडेंच आहे ? हा अगदीं सामान्य नियम आहे. आईबापांचे विशिष्ट गुण संततींत उतरलेच पाहिजेत. आईबाप निरोगी तर प्रजा निरोगी होणार. तीं उभयतां शरीरप्रकृतीनें नाजूक तर प्रजा नाजूक, आईबाप जर सुरूप तर प्रजा सुरूप, व जर मातापितरें सुदृढ व सतेज, तर मुलेंही

पराक्रमी व तेजःपुंज निपजतील. उत्तम आचार विचार, औदार्य इत्यादि सद्गुण किंवा निर्दयता आदिकरून दुर्गुण भावि पिढींत बहुतकरून तंतोतंत रीतीनें उतरतात. मातापितरें जर आपली जबाबदारी योग्यप्रकारें ओळखतील तर आपलें घर थोड्याच परंतु शक्तिसंपन्न, सौंदर्यपूर्ण, बुद्धिवान, थोर व गुणशाली अशा बालकांनीं परिपूरित होऊन नंदनवनाचें सौख्य अनुभविण्यास सांपडेल. ज्या समाजांत आपणांस वागावयाचें आहे त्यानेंच आपणांवर त्याच्या अवयवांत योग्य अवयव घालण्याची जबाबदारी टाकलेली आहे, परंतु त्यांत जर निःशक्त माणसांची भर पडली तर समाजाचा जोम काय राहाणार ? उलट संपत्तीचा मात्र नाश होणार. कारण असल्या माणसांच्या जोपासनेकरितां समाजाला किती तरी श्रम पडतात. इस्पितळें, वेड्यांचीं इस्पितळें, अपराधी मुलांस सद्वर्तनास लावणाऱ्या संस्था, दिवाणी व फौजदारी कोर्टें, हीं सर्व याचींच निदर्शक आहेत. आज ज्या हजारों स्त्रिया संसार करीत आहेत त्यांत सुद्धां पूर्ण आरोग्यसंपन्न अशी एक तरी स्त्री सांपडेल कीं नाहीं कोण जाणें ! ज्यांना पितृत्वाची जबाबदारी शिरावर घ्यावयाची इच्छा आहे अशा मुलांनीं प्रथम स्वार्थपरायणतेचा त्याग केला पाहिजे. स्वार्थपरायणता ह्मणजे दुसऱ्याची पर्वा न करतां स्वतःवर सकपट प्रेम ठेवण्याची वृत्ति–ह्या वृत्तीची संवय झाली ह्मणजे आपली विवाहित पत्नी ही

फुरसतीच्या वेळचें करमणुकीचें साधन आहे, याखेरीज तिला विशेष मूल्य नाहीं असें मानण्याकडे प्रवृत्ति होते—आणि ह्मणून तिला अक्षरशत्रु ठेवण्याकडे अशा माणसांचा कल होतो. कारण ती विद्वान् झाली तर आपला पुरुषार्थ गाजवितां येणार नाहीं अशी त्यांना भीति असते. कित्येक वेळां स्त्रियांचा दोष असतो, नाहीं असें नाहीं, परंतु पुरुषांनींही स्त्रियांचा विश्वास संपादन करणें हें त्यांचें आद्य कर्तव्य आहे. कारण पत्नीशीं तुटकपणा असला म्हणजे तिलाही पती-विषयीं तितका अनादरभाव जरी नाहीं तथापि कमीपणा वाटूं लागतो—बाकी पतीविषयीं अप्रेमबुद्धि बाळगण्याचें आमच्या हिंदु स्त्रियांचें शीलच नाहीं—तथापि त्यांच्या सद्गुणाची किंमत झाली नाहीं तर त्यांना दुःख झाल्या-वांचून रहात नाहीं.

एकंदरीनें पहातां स्त्रियांची प्रस्तुतची स्थिति समाधान-कारक नाहीं. त्यांत सुधारणा होणें अगदीं अवश्य आहे. मुख्य कारण असें कीं, स्त्रियांना आपल्या स्थितीची अगदीं पूर्ण संवय होऊन गेलेली आहे, त्यामुळें त्यांची वास्तविक योग्यता काय आहे व प्रस्तुत त्यांना किती अवनत दशा आलेली आहे हें त्यांच्या कांहीं लक्षांत येत नाहीं. एकतर गतानुगतिकत्वाकडे मनाचा पूर्ण ओढा, व अंधपरंपरेनें, जें चालत आलें आहे तें तसेंच पुढें चालू ठेवण्याची बुद्धि ही

सर्वस्वी नडते आहे. स्त्रियांच्या योग्यतेविषयीं महाभारतांत म्हटलें आहे कीं:–

"अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा ।
भार्या मूलं त्रिवर्गस्य भार्या मूलं तरिष्यतः ॥ "

म्हणजे "भार्या ही मनुष्याचें अर्धांग आहे. भार्या ही उत्तम मित्र आहे. धर्म, अर्थ आणि काम या तीन पुरुषार्थांची मूळ भार्याच आहे. आणि भार्येच्या योगानेंच मनुष्य हा संसारसमुद्र सहजगत्या तरून जातो." ग्रंथाधारें स्त्रियांना आपली योग्यता समजून देणें व वास्तविक ती तशी असणें यांत फरक आहे. कारण त्यामुळें त्या प्रशंसनीय बनत नाहींत, तीं साधनें भिन्नच आहेत. याचा विशिष्ट उपयोग असेल तर एवढाच आहे कीं, स्त्रियांना आपल्या योग्यतेचें जें विस्मरण झालेलें आहे तें नष्ट होण्यास ग्रंथवचनें कारणीभूत होतात. एका सिंहाच्या छाव्याची जी गोष्ट आहे कीं, तो जन्मल्यापासून मेंढरांच्या कळपांत वाढला. त्यामुळें जातिस्वभाव अगदीं विसरून गेला होता व निरुपद्रवी बनला होता, परंतु त्याच्या मूळ स्वरूपाचा परिचय कोणी करून देतांच तो एकदम उग्र बनला व वनराज या संज्ञेस पात्र झाला. सांगावयाचें म्हणून इतकेंच कीं, स्त्रियांची लुप्त झालेली योग्यता पुनः त्यांना प्राप्त करून देणें हें पुरुषांचें विशेषतः तरुण पिढीचें कर्तव्य आहे. कित्येक वेळां

' स्त्रिया अज्ञान ' 'त्यांना काय समजतें आहे ?' 'त्यांना काय सांगावयाचें आहे' 'त्यांचें ज्ञान चुलीपुरतें' असें पुरुष म्हणतांना दृष्टीस पडतात, परंतु स्त्रियांना जाणून बुजून जर अज्ञानांधःकारांत ठेविल्या तर त्यांचा तरी काय दोष आहे बरें ? आपण त्यांना शिक्षणामृत आग्रहानें पाजलें तर नको म्हणण्याची त्यांची कांहीं प्राज्ञा नाहीं. पतीची आज्ञा म्हणजे देवाची आज्ञा असा आमच्या हिंदु स्त्रियांचा भाव आहे. भावि आयुष्य सुखमय करण्यास तरुणांचें आद्य कर्तव्य तेंच आहे. भावि पिढीच्या कल्याणाकरितां तरी स्त्रियांना शिक्षण हें अवश्य आहे. मागें सुधारकांत 'गृहिणी कीं मोलकरिणी' या मथळ्याचा एक लेख प्रसिद्ध झाला होता. त्यांत कदाचित् कोणाला अतिशयोक्ति वाटण्याचा संभव आहे, परंतु तसें नसून त्यांत स्त्रियांच्या स्थितीचें चित्र अगदीं उत्तमप्रकारें रेखाटलें होतें. सर्व दिवसभर प्रपंचाचीं कामें मोटेला जुंपलेल्या बैलाप्रमाणें करावीं, त्यांतून वर मान करण्यासही फुरसत असूं नये व मुलें संभाळणें व चुलिका-धर्म हीच जिच्या कर्तव्याची इतिश्री त्या गृहिणीची स्थिति खरोखर शोचनीयच नाहीं का? स्त्रीपुरुषांना उन्हाची व पर्जन्याची बाधा सारखीच होते पण स्त्रियांना रवितापनिवा-रणार्थ किंवा पर्जन्याच्या मसळधारांतही छत्रीची अवश्य-कता भासत नाहीं किंवा भासली तरी लोक नांवें ठेवतील मग ती गोष्ट कशाला करा अशी सहजच मनाला शंका

येते. गृहस्थितींत ज्याप्रमाणें इष्ट सुधारणांचें अवलंबन केलें पाहिजे त्याप्रमाणें स्त्रियांच्या योग्यतेंतही फरक झाला पाहिजे. पुरुष ज्या विद्यानंदसाम्राज्यात विहार करीत असतात त्याचा एक सहस्रांशसुद्धां त्यांच्या पत्नीला ठाऊक नसतो. पुरुषांना मिल्टन, शेक्सपियर यांचा पूर्ण परिचय, परंतु तेंच त्यांच्या पत्न्यांना कशाशीं खावयाचें हें माहीत नसतें. या पुण्यासारख्या शहरीं किंवा मुंबईस चार स्त्रिया सुशिक्षित दिसल्या, किंवा तुमच्या व्यवसायभगिनी रात्रंदिवस तुमच्या बरोबरीनें येथें अभ्यास करीत आहेत त्यांच्यावरून सर्व जगाची परीक्षा करू नका. सर्वच स्त्रियांना ग्रॅज्युएट होण्याची जरूर आहे असें माझें मत नाहीं. ज्यांना उमेद आहे, हौस आहे व परिस्थिति अनुकूल आहे, त्यांना ग्रॅज्युएट होण्यास प्रत्यवाय नाहीं. परंतु संसार करणें हेंच जन्मास येऊन बहुतेकींचें ध्येय असल्यामुळें सुगृहिणी व सुमाता होण्यास योग्य असेंच शिक्षण प्रत्येक स्त्रीस मिळालें पाहिजे. कारण अविवाहित रहाण्याचा ज्यांचा निर्धार आहे अशा मुली आपल्यांत फार थोड्या आहेत. बहुश्रुतपणा उत्पन्न करणें व सर्व विषयांची सांगोपांग माहिती स्त्रियांना करून देणें, हें पुरुषांचेंच काम आहे. राष्ट्राची भावि उन्नतीसुद्धां स्त्रियांच्या ज्ञानसपन्नतेवर अवलंबून आहे, म्हणून आपणांस एका आधुनिक कवीच्या शब्दांत येवढेंच सांगणें आहे कीं:—

"सुशिक्षण स्त्रियांसि द्या, सदयता मनीं स्वीकरा ।
उदार मन ठेउनी, सतत त्या जनीं आदरा ॥
मिळेल बल तें तुह्मां, खचित राष्ट्रवाढीस हो ।
प्रधान गणतां कसें, प्रगतिशून्य रूढीस हो ॥ १ ॥
अनिष्ट स्थिति पाहुनी, उचित मार्ग सेवावया ।
प्रयत्न करितां भला, जरि सुधारणा व्हावया ॥
फसे नवल काय हो, गृहिं न गंध या क्रांतिचा ।
इमारत टिकेल कां जरि न शुद्ध पाया तिचा ॥ २ ॥
समाजबलवर्धना, खचित लागतीं सुगृहें ।
ह्मणोनि गृहिणींस द्या, रुचिर शिक्षणा आग्रहें ॥
स्त्रिया भगिनि जोंवरी, तिमिरसागरीं वाहती ।
तयां न वर ओढितां, कशि घडे समाजोन्नती' ॥ ३ ॥

स्त्रियांची अवनत स्थिति आज जी आपल्या दृष्टोत्पत्तीस येते, याचीं कारणें बालविवाह व तदनुषंगिक शिक्षणाचा अभाव हींच होत. ह्मणून प्रौढविवाह प्रचारांत आले पाहिजेत. प्रौढविवाह सार्वत्रिक झाले म्हणजे त्या काळापूर्वी मुलांमुलींना विद्यार्जन करण्यास पुरेसा वेळ सांपडेल. तेवढ्यांत मुलांची व मुलींची शरीरसंपत्ति उत्तम रीतीनें वाढेल, व त्याचे इष्ट परिणाम भावि काळांत पहावयास सांपडतील. 'महिला विद्यालया'सारख्या पवित्र वातावरणांत सुशिक्षित व सर्वकलासंपन्न झालेल्या वधूचें पाणिग्रहण करण्यास कोणत्या तरुणास अभिमान वाटणार नाहीं ? शिक्षण नुसतें

एकदेशी असावें असें मला सुद्धां वाटत नाहीं; तें सर्वांगपरिपूर्ण, 'accomplished girl' ह्मणविण्यास योग्य, असें प्रत्येक मुलीस पाहिजे, ह्मणजे स्वयंपाकशास्त्र, शिवणकाम, विणकाम, शुश्रूषिकेचीं कर्तव्यें, स्वच्छता ठेवणें, गानवादन, चित्रकला वगैरे सर्व आलें पाहिजे. स्त्रियांच्याठायीं निसर्गतः विनयशीलता, पतिहिततत्परता, बालसंगोपनदक्षता, सत्कृत्यप्रियता व व्यवहारचतुरता इत्यादि गुण असतातच, त्यांचा उपयोग करून घेतला पाहिजे. तसें करण्यास त्यांच्या बुद्धीचा विकास झाला पाहिजे. बांधवहो ! आपलीं घरें आदर्शगृहें असावीं अशी जर आपली इच्छा असेल तर प्रौढवधू सुशिक्षित अशीच आपण पसंत केली पाहिजे नव्हे तसें करण्याचा आपला निधार पाहिजे. त्याच्या उलट कृति ह्मणजे समाजाच्या हिताविरुद्ध आपण पाप करीत आहों अशी मनाची दृढ भावना पाहिजे. वास्तविक स्त्रियांना २० वर्षांपुढें हा लग्नाला योग्य काळ आहे, परंतु तो शक्य नसेल तर निदान पूर्ण षोडशवर्षा वधू पाहिजेच. लग्नापूर्वी पाहिजे तर वाङ्निश्चय करून ठेवावा. हलींच्या विवाहविधींतील रीत जर पाहिली तर अशी आहे कीं, लग्नासाठीं नवरा मुलगा आणावयाला रुखवत जातें आणि तेवढ्या वेळांत इकडे वाङ्निश्चय उरकून घेतला जातो! वाङ्निश्चयानंतर विवाह इतक्या अल्प काळांत झालाच पाहिजे अशी वास्तविक शास्त्राचीसुद्धां आज्ञा नाहीं. आपल्यास इष्ट असलेलें स्थळ हातचें

जाऊं नये ह्मणून केवळ ती सोय आहे. विवाहसंस्कार हवा तेव्हां मग करावा, यापासून फायदेसुद्धां बरेच आहेत. मुलांमुलींचे गुणावगुण बराच काळपर्यंत अनुभविण्यास संधि सांपडते. अशा रीतीनें चालरीत समजून मनाला नच पटलें, किंवा कांहीं बरा वाईट प्रसंग आला तर मुलां-मुलींच्या जन्माचें नुकसान न होऊं देतां योग्य रीतीनें वाङ्‌निश्चय रद्द ठरवून मुलांमुलींनीं अन्य स्थळें पसंत करावीं. त्यांतून ज्या मुलींना आजन्म अविवाहित रहा-ण्याची इच्छा असेल त्यांच्याविरुद्ध ब्रही न काढणें व त्यांच्याविषयीं आदरभाव जागृत करणें हेंही तरुणांचें कर्तव्य आहे. मत्स्यपुराणांत ह्मटलेलें आहे कीं:—

" शास्त्रेषूक्तमसंदिग्धं बहुवारं महाफलम् ।
दशपुत्र समाकन्या या न स्याच्छीलवर्जिता ॥ "

ह्मणजे " अनेक शास्त्रांत निश्चयानें बहुवार महाफल-दायक अशी एक गोष्ट सांगितली आहे. ती ही कीं, जी उत्तम शीलसंपन्न कन्या आहे ती योग्यतेनें दहा पुत्रांसमान आहे." या श्लोकांत कन्येला किती मोठेपणा दिला आहे? दुसरेसुद्धां संस्कृत ग्रंथांतरीं असे आधार सांपडतात; त्यावरून असें सिद्ध होतें कीं, पुत्रांऐवजीं कन्या अवि-वाहित राहूं शकतात व त्यांना सर्व कर्में करण्याचा, तर्पण करण्याचासुद्धां अधिकार आहे. असो.

जे विवाहेच्छु तरुण किंवा स्त्रिया असतील त्यांनीं

एकवार Dr. John, Cowan, M. D. यांच 'The Science of a New Life' हें पुस्तक अवश्य वाचावें, अशी माझी शिफारस आहे. त्यावरून भावि आयुष्य सुखमय करण्याची गुरुकिल्लीच आपल्या हातीं सांपडल्यासारखें होईल.

प्रौढविवाहानें संतति उत्तम निपजेल हें तर उघडच आहे, परंतु सासुरवास या शब्दाचा जो 'जाच' असा विपरीत अर्थ झाला आहे त्यासही आळा बसेल. मन सुसंस्कृत झाल्यामुळें दागिने व संतति यांची जी अमर्याद हांव स्त्रीवर्गांत दिसून येते व अज्ञानामुळें नवससायास करण्याकडे प्रवृत्ति होते ती नष्ट होईल. लहान बालिकांना सासर ह्मटलें ह्मणजे किती भयंकर वाटतें! कीं त्यांना अल्लड वृत्तीचा त्याग करून गंभीर व्हावें लागतें. यदृच्छाहार ठेवावा लागतो. हौस नष्ट करून मिळेल त्यांत संतोष मानला पाहिजे. नाजुकता विसरून सहनशीलता अंगीं आणावी लागते. त्यांनीं मोकळ्या मनानें हंसावयाचें बोलावयाचें नाहीं, दुखल्या–खुपल्यास कुरकुरावयाचें नाहीं व केव्हांही जडभारी काम आलें तरी नाहीं ह्मणावयाची सोय नाहीं.

अलीकडे कित्येक मुलें B. A., M. A. ची डिग्री घेतल्याविना विवाहच करावयाचा नाहीं असा निश्चय करतात ही गोष्ट फारच उत्तम व अभिनंदनास्पद आहे, परंतु

त्याचवेळीं त्यांनीं विजोड विवाह होऊं नयेत अशी खबरदारी घेतली पाहिजे.

पत्नीबद्दल पोपनें ह्मटलें आहे कीं:—

"All other goods by fortune's hand are given
A wife is the Peculiar gift of heaven."

पत्नीचें अंतःकरण ह्मणजे विविध प्रकारच्या काळज्यांनीं त्रस्त झालेल्या पतीच्या चित्ताचें विश्रांतिस्थानच आहे. पत्नीविना मनुष्याचा संसार होत नाहीं. कित्यक वेळां मित्रसुद्धां पारखा होतो, परंतु सुशील गृहिणी पतीचा त्याग करण्यास कधींच प्रवृत्त होत नाहीं. पतिपत्नींचें हृदयैक्य मात्र उत्कृष्ट प्रकारचें पाहिजे. ह्मणजे कितीही विपत्ति येवो, मनुष्य डगमगणें शक्य नाहीं. अशा प्रसंगीं पतिपत्नी एकरूप होऊन परस्परांवर असलेल्या बहुमूल्य विश्वासामुळें परस्परसहायकारी होतात व पत्नी आपल्या पतीस मार्गदर्शिकेप्रमाणें उपयोगी पडते; "संपत्तीच्या काळांत ज्या पत्नीचा उपयोग मित्राप्रमाणें होतो ती विपत्तीमध्यें शांत व रम्य अशा एकांत स्थलाप्रमाणें उपयोगी पडते" असें एका विद्वानानें ह्मटलें आहे. दैवदुर्विलासाच्या काळांत स्त्रिया कित्येक वेळां आपलें अद्वितीय धैर्य प्रकट करतात. एक कवि ह्मणतो, "रत्नाकरांतील रत्नभांडार हें स्त्रीप्रीत्यंतरगत मानवसौख्यापेक्षां कमी मूल्यवान् आहे."

खरोखर मुलीला किंवा १५।१६ वर्षांच्या मुलाला तरी काय समजतें ? मग त्यांचा तो विवाह खरा तरी कसा ? कारण व्यवहारांतसुद्धां एखाद्याला वचन देतेसमयीं आपण काय देतों याचा अर्थ जर आह्मांस कळला नाहीं तर सहजच आह्मी बेफिकीर राहूं. मग अग्निद्विजांसन्मुख घेतलेली ती शपथ कशाप्रकारें पाळली पाहिजे ? याचा विचार आपणच करा नुकताच कोणाजवळ बोलण्याचा प्रसंग आला असतांना त्यांनीं असें उत्तर दिलें कीं " माझीं दोन लग्नें झालीं तथापि मला अजून विवाहमंत्रांचा अर्थ कळला नाहीं. "

पतिपत्नींमध्यें जिवलग मित्रांपेक्षांही शतपट अधिक अशी मैत्री असली पाहिजे. ह्मणून दोघांच्या बुद्धीच्या विकासांत, अंत:करणाच्या वृत्तींत अगदीं समानता पाहिजे. ( एक दुसऱ्यापेक्षां सर्वतोपरी श्रेष्ठ व दुसऱ्याची योग्यता अगदी कमी असें उपयोगी नाहीं. ) तसें असलें तर योग्य कामीं सल्लामसलत देतां येणार ना ? पत्नीला ज्याप्रमाणें पतीबद्दल अत्यंत आदर वाटतो व तो देवासारखा वंदनीय वाटतो, तद्वतच पतीला पत्नीविषयींही देवतेप्रमाणें पूज्यबुद्धि वाटली पाहिजे.

कोणाही मनुष्यप्राण्याचा स्वभाव असा असतो कीं, तो मूळचा कसाही असो, इतरांच्या वागण्याचा परिणाम त्याच्यावर थोड्याबहुत प्रमाणानें होतोच. मग ज्या

पत्नीशीं पतीचा किंवा पतीशीं पत्नीचा निकटसंबंध जड-लेला असतो, त्यांच्या अन्योन्यसहवासामुळें परस्पर स्वभावावर किती परिणाम होत असेल तो पहा. ह्मणून दोघांहीमध्यें विचारौदार्य, पवित्र वर्तन, मनमिळाऊपणा, आदिकरून सगळे गुण पाहिजेत, नाहींतर एकाच्यामुळें दुसऱ्याच्या सद्गुणांचा विकास होण्याऐवजीं उलटा ऱ्हास मात्र व्हावयाचा.

पतिपत्नींचे गुण व अभिरुचि अगदीं समसमान असणें हेंही अवश्य आहे. कारण तसें नसेल तर सौख्याचा भाग कमी अनुभवास येईल. पतीचें हृद्गत पत्नीला कळलें पाहिजे, तशी तिच्यांत शक्ति नसेल तर खरी प्रेमोत्पत्ति कशी होणार ? प्रेमदृष्टीस सर्वच रमणीय भासतें ही गोष्ट जरी खरी आहे, तथापि अक्षम्य दोष असतील तर ते ह्मणजे प्रेमामुळें झांकले जातात असें कांहीं नाहीं. मुख्यतः स्त्रियांना आपल्या पतीला हरएक कामांत मदत करतां येईल इतकी त्यांची योग्यता पाहिजे. पति-पत्नीचे संवाद उपयुक्त व उन्नतिकारक विषयांवर झाले पाहिजेत. वास्तविक सौख्य होण्यास घरांत आपणांस विश्रांति व चित्तास शांति मिळाली पाहिजे. घरीं समाधान होईल अशी आपली खात्री असली तर किती तरी औत्सुक्यानें आपल्या आरामस्थानाकडे आपण जाल व त्यामुळें मानसिक श्रम किती लवकर दूर होतील व जीवन-

कलहार्थ परिश्रम करण्यास पुनः नवीन हुरूप कसा प्राप्त होईल हें अनुभवाविना कळावयाचें नाहीं. पतिपत्नींचें धोरण, उमेद चिंता, सर्व एक पाहिजेत. मनुष्याचें सुख-दुःख केवळ पत्नीवर अवलंबून आहे. त्याची सज्जनता सुद्धां त्याच्या गृहास्थितीवर अवलंबून आहे. प्रपंचांत खरें सुख जर आपणांस पाहिजे असेल तर पतिपत्नींत नेहमीं तडजोड करण्याचीही बुद्धि पाहिजे. सदोष दृष्टि न ठेवतां आपल्याशीं इतरांनीं प्रेमानें वागावें अशी इच्छा प्रत्येकास असते ह्मणून आपणही तसेंच वागलें पाहिजे. सुस्वभावी माणसें सर्वांना आपलेसें करून घेतात. पतिपत्नींचा वर्तन-क्रम एका आधुनिक कवीच्या ह्मणण्याप्रमाणें असावा. तो असा:—

संसार हा भौतिक प्रेमगाडा ।<br>
ईर्षा सुखाशा द्वयचक्र जोडा ॥<br>
माखोनियां शिक्षण ओंगणानें ।<br>
त्या ओढिती दंपति भूषणानें ॥ १ ॥<br>
सन्मार्गि जातां रथ नीट जातो ।<br>
दुर्मार्गि जातां अपघात होतो ॥<br>
कर्तव्यतेच्या करि कासरातें ।<br>
घ्यावें, सुधे नेइल आपणांतें ॥ २ ॥

लग्नासंबधीं एका थोर गृहस्थाचें म्हणणें आपण लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तें असें:—" विवाह करते समयीं

वधूच्या संपत्तीकडे अगर रूपाकडे पाहून तिची निवड करूं नये. कुलशीलाकडे पाहून करावी. लग्नापासून खरें सौख्य व्हावें अशी इच्छा असेल तर सद्गुणी आणि ज्ञानसंपन्न स्त्रीच पसंत करा. पत्नी अगदीं स्तब्धही उपयोगी नाहीं, किंवा वाचाळही नसावी, तशीच ती सुशिक्षित असली पाहिजे. निदान आकलनशाक्ति तरी तिच्यांत असावी. अशी स्त्री संसारांत कसाही प्रसंग आला तरी धिमेपणानें वागेल. संपत्तींत तिला गर्व होणार नाहीं. विपत्तींत तिच्या ठायीं धैर्य राहील. तिच्या सुशीलतेमुळें मुलेंही सुशील निपजतील. प्रेमळ पत्नी घरीं असल्यावर, बाहेर कितीही आनंददायी मित्रमंडळ असलें तरी घरीं केव्हां जाऊं असें सहजच वाटेल. ”

पतीच्या कार्याबद्दल कळकळ आणखी सहानुभूति ठेवून त्यास मदत करणें हें गृहिणींचें काम आहे. जॉन स्टुअर्ट मिल्ल यांची पत्नी ह्मणजे एक रत्न होतें. ‘ स्वातंत्र्य ’ या विषयावर मिल्लसाहेबांनीं एक उत्कृष्ट निबंध लिहिला आहे. त्याच्या आरंभीं त्यांनीं जें तिच्याविषयीं ह्मटलें आहे तें हृदयंगम आहे. तें असें:—

“ To her memory who was the inspirer and in part the author of all that is best in my writings—the friend and wife whose exalted sense of truth and right was my strong-

est incitement and whose approbation was my chief reward, I dedicate this volume." ह्मणजे "जिच्यामुळें उत्तम लेख लिहिण्याची स्फूर्ति मजमध्यें उत्पन्न झाली, त्यांतील कांहीं कांहीं उत्तम भाग जिच्या स्वतःच्या कृतींचें फळ होय, जिच्या उच्च सत्यनिष्ठेनें व न्यायप्रियतेनें असे लेख लिहिण्यास नेहमीं मला उत्तेजन मिळालें, व जिची मान्यता हेंच माझें उत्तम बक्षीस असे, अशा माझ्या प्रिय सखीस—पत्नीस हा ग्रंथ मी अर्पण करितों.

पतीनें आपल्या पत्नीचीं मतें स्वतःप्रमाणें बनविणें हें अत्यंत अवश्य आहे, नाहीं तर विचारभिन्नतेमुळें कलह होण्याचा संभव असतो, व पुरुषांना आपलीं सुधारलेलीं मतें झुगारून देऊन नीतिधैर्य नाहीं असें जनसमूहाकडून म्हणवून घ्यावें लागतें. त्याशिवाय 'प्रेमनिराशा' नाटकांतील नानासाहेब व इंदिरा या दंपत्याप्रमाणें कुटुंबसौख्याचा नाश होतो तो वेगळाच. संसार सुखमय होण्यास पतीपत्नींमध्यें स्वभावसादृश्य असणें ही गोष्ट अत्यंत जरूर आहे. 'एकेस्थानीं उभय परि ते भिन्न सारे विचार ' असें उपयोगी नाहीं. बाह्यात्कारी लोकांना तादात्म्य झालेंसें वाटलें तरी अंतर्याम एक असेल तर उपयोग ! पतिपत्नीचें हृदयैक्य होऊन विवाहसंबंध जुळणें ही मोठी अजब चीज आहे. भवभूतीनें आपल्या उत्तररामचरित्रांत 'अपत्य'

या शब्दाची व्याख्या देतांना पतिपत्नींच्या एकरूपतेचें मोठें मार्मिक वर्णन केलें आहे. तो म्हणतो: -

" अंतःकरणतत्त्वस्य दंपत्योः स्नेहसंश्रयात्
आनंदग्रंथिरेकोऽयमपत्यमिति बध्यते ॥ "

याचा अर्थ स्पष्टच आहे कीं, " मातापितरांच्या अंतः-करणांच्या तत्त्वांची आणि स्नेहसंश्रयाच्यायोगानें बांध-लेली अशी जी आनंदमय गांठ तिला अपत्य म्हणावें. " हीं अंतःकरणांचीं तत्त्वें जर पूर्णपणें जुळलेलीं नसलीं तर खरोखर त्यासारखें दुःख नाहीं. अंतःसमता नसेल तर विवाह हा पोरखेळासारखा प्रकार होईल. अशा दंपत्यांना लोक कदाचित् सुखी म्हणतील, परंतु खऱ्या सौख्याची प्राप्ति त्या उभयतांनाही व्हावयाची नाहीं. कारण त्यांचे आत्मे संलग्न झालेले नसावयाचे. आपल्यामध्यें असे विजोड विवाह कितीतरी होतात कीं त्यामुळें पतीला लग्नापासूनच आपल्या पत्नीचा तिटकारा येतो. त्यामुळें तें लग्न कांहीं दोघांनाही सुखावह होत नाहीं. 'मनोरंजना'च्या दरबार-अंकांतील ' संपादिका ' ही गोष्ट अशाच प्रकारची आहे. त्यांतील नायक रघुनाथराव यांना आपली पत्नी जानकीबाई हिचा विलक्षण तिटकारा उत्पन्न झाला होता. आतां पुढें ती विद्वान् निपजून पतिप्रेमास पात्र झाली, हा भाग निराळा. तसें भाग्य सर्वांचेंच नसतें. पत्नीला प्रायः पति पसंत पडला नाहीं तरी आमच्या हिंदु स्त्रियांचें जें ब्रीद कीं पति म्हणजे

परमेश्वर, या न्यायानें त्या नाखुष असणें शक्यच नाहीं. परंतु मुलांची स्थिति तशी नसते. त्यांना वाटेल तें करण्याची मोकळीक ठेविलेली आहे, प्रथमपत्नी गत झाल्यावर तिच्या चवदाव्या दिवशीं जरी त्यांनीं पुनः मुंडावळ बांधली तरी समाजाची परवानगी आहे. त्याच अल्पवयस्क मुली दुर्दैवानें पतिसुखास मुकल्या कीं त्यांचें जीवित व्यर्थच जातें. अशा समयीं वडील माणसांचें मन वळवून सर्वतोपरी प्रेमभावानें वर्तन करून आपल्या घरांतील भगिनी किंवा भावजया ज्या अशा अनाथ झाल्या असतील त्यांची स्थिति शक्य तितकी संतोषास्पद करणें हें सुद्धां तरुण पिढीचेंच कर्तव्य आहे. यांत सुद्धां सुशील पत्नीची मदत चांगली होते. सारांश, पतिपत्नी समानशील असून उभयतांचें अंतःकरण एक असलें ह्मणजे सर्वतोपरी पुरुषांना गृह हें सौख्यकारी होणारच व त्याचा इष्ट असा परिणाम भावी आयुष्यावर झालाच पाहिजे.

आपण सध्यां तरुण आहां. नवें रक्त आपल्या शरीरांतून खेळत आहे तोंपर्यंत वृद्धावस्थेच्या कल्पना आपल्या मनांत येणें शक्य नाहीं. परंतु ज्या तुमच्या मातापितरांनीं केवळ भावी सुखाकडे लक्ष देऊन तुमचें पालनपोषण केलें, हरतऱ्हेचे कष्ट सोसले, विद्यादान दिलें, त्यांना आपण आजन्म विसरूं नका. त्यांना योग्य सन्मान द्या. आपण जरी सौख्याच्या, वैभवाच्या व अधिकाराच्या

शिखरावर चढलां तरी त्यांना आपल्या हृदयांत स्थान असूं-द्या. ' विद्या विनयेन शोभते, ' हें सदैव ध्यानांत धरा. शक्य तितकें त्यांच्याविरुद्ध जाण्याचा प्रयत्न करूं नका. परंतु जर तुमच्या आयुष्याला भिन्न दिशा लावण्यासारखी एखादी गोष्ट असली किंवा सर्व जन्माचें नुकसान होण्या-सारखें असलें, तर गोड शब्दांनीं त्यांचा गैरसमज दूर करा. मुलींच्या इतकें मुलांना आईबापांविषयीं प्रेम नसतें असें जगांत म्हणतात, परंतु या आक्षेपास जागा देऊं नका. ज्यांनीं आपल्या साहाय्याची अपेक्षा करून स्वतः-च्या आयुष्याचे दिवस काढले, सर्वतोपरी स्वार्थत्याग केला, स्वसुखनिरभिलाष राहिले त्यांना मदत करणें हें आपलें आद्यकर्तव्य आहे. वडिलांना न आवडणारी व तुमच्या गैरहिताची गोष्ट असेल, तर त्या मोहापासून किंवा व्यसना-पासून तुमची तत्क्षणीं परावृत्त होण्याची तयारी पाहिजे. स्वतःच्या वर्तनामुळें त्यांना दुःख होईल असें करूं नका. पुष्कळ वेळां माझ्या असें पाहण्यांत येतें कीं, वडिलांचीं प्रागतिक किंवा उदार मतें सुद्धां तरुणांस पसंत नसतात व तीं न आचरिल्यानें ते आपलें हंसें करून घेतात. वास्त-विक असें कां असावें ? प्रायः मुलें पित्याचें अनुकरण करतात असा नियम आहे. वडिलांच्या कीर्तींत तुमच्या हातून भर पडेल अशीच वागणूक असावी. आपलें प्राप्तव्य अतिशय उच्च प्रकारचें असूंद्या ह्मणजे निराशायुक्त

होण्याचा प्रसंग येणार नाहीं. देशाची भावी सुसंपन्नावस्था आपणांवर अवलंबून आहे. राष्ट्रीय पुरुष आपणच आहां. किती तरी महत्वाचा व जबाबदारीचा कर्तव्यभार आपणांस आपल्या शिरावर घ्यावयाचा आहे.

नैतिक बाबींसंबधीं विचार करावयाचा म्हणजे त्यांत शीलसंपन्नतेचा मुख्यत्वेंकरून अंतर्भाव होतो. कुल हें यदृच्छेनें मिळतें. तें मिळविणें आपल्या स्वाधीन नाहीं, परंतु शील हें ज्याचें त्यास प्रयत्नानें प्राप्त करून घ्यावयाचें असतें. त्यावर मनुष्याची योग्यता व सर्व आयुष्याची इतिकर्तव्यता, यशापयश हें अवलंबून असतें म्हणून आपण शीलवान् व्हा. दुसऱ्याचें वैभव किंवा सौख्य पाहून अंतःकरणास यत्किंचितही विषाद वाटूं देऊं नका. शीलाविषयीं पुराणांतरीं प्रसिद्ध असलेली एक गोष्ट आहे. तिचें तात्पर्य ध्यानांत ठेवण्यासारखें असल्यामुळें ती गोष्टच मी आपणास सांगतें.

प्रल्हादानें इंद्रापासून त्रैलोक्याचें राज्य हरण करून आणल्यावर तें परत कसें मिळेल, अशी इंद्रास चिंता पडून तो बृहस्पतीकडे गेला. तेव्हां त्यानें सल्ला दिली कीं, ' प्रल्हाद आहे शीलसंपन्न. तेवढी त्याची शीलसंपन्नता जर तूं प्राप्त करून घेशील तर ऐश्वर्य पुनः मिळेल. ' गुरूचे हे शब्द ऐकतांच इंद्र ब्राह्मणवेषानें जाऊन प्रल्हादाचे सेवेस राहिला. अशा प्रकारें बरींच वर्षे सेवा झाल्या-

वर प्रल्हाद प्रसन्न झाला व ब्राह्मणरूपी इंद्रास म्हणालाः ' तुला जें पाहिजे असेल तें सांग. मला फार संतोष झाला आहे. मी तुझी इच्छा पुरवीन. ' इंद्र म्हणालाः ' महाराज, त्रैलोक्याधीश हें पद आपण कसें मिळविलें ? ' तेव्हां तो म्हणालाः ' ह शुक्राचार्य गुरुमहाराजांच्या कृपेचें फळ आहे. मी नीतिमार्गाचें अतिक्रमण केलें नाहीं. ब्राह्मणांना कधी पीडा दिली नाहीं. आतां तुला कसली इच्छा आहे ? ' इंद्र म्हणालाः ' दुसरी काहीं नाहीं, आपणापाशीं असलेल उत्तम शील तेवढें मला द्या म्हणजे झालें. ' प्रल्हादानें 'बरें आहे' असें म्हणताच इंद्र नमस्कार करून निघून गेला. थोड्याच वेळांत प्रल्हादाचे शरीरांतून एक तेजस्वी पुरुष बाहेर पडला. त्याला ' तूं कोण ? ' असें विचारतांच तो म्हणालाः ' माझें नांव शील आहे. तूं माझा त्याग केलास म्हणून मी ब्राह्मणाकडे जातों. ' तो अंतर्धान पावल्यावर तसाच दुसरा निघाला. त्याला तसेंच विचारतां तो म्हणालाः 'मी धर्म आहें. जेथें शील रहातें, तेथेंच माझी वस्ती. ' त्याचे मागून तिसरा पुरुष निघाला. तो म्हणालाः ' मी सत्य आहें. शील व धर्म जेथ गेले तेथेंच मी जातों.' नंतर चवथा निघाला. त्याचें नांव सद्वृत्त. तोही गुप्त झाला. इतक्यांत मोठा शब्द झाल व पांचवा पुरुष बाहेर आला. त्याचें नांव बल होतें. तो गेल्यावर महातेजस्वी अशी सुंदर स्त्री बाहेर आली. तिनें

आपलें नांव लक्ष्मी असें सांगून 'ज्या ठिकाणीं शील, धर्म, सत्य, सद्वृत्त, व बल हे असतात त्याच ठिकाणीं मी स्थिरत्वानें असतें' असें म्हणून ती गेली. यावरून शीलाची योग्यता आपल्या ध्यानीं येईल.

मुख्यतः नीति, सदाचार व दानत हीं चांगलीं राखलीं पाहिजेत. मन बिघडण्यास नाटकासारखें कारण सुद्धां पुरेसें होतें व त्यापासूनच पुढें व्यसनाकडे प्रवृत्ति होते. टिटॅनिक आगबोटीच्या अपघातांत मृत्यु पावलेले 'रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूजचे, सुप्रसिद्ध संपादक मि. वुइल्यम टॉमस स्टेड यांनीं ५३ वर्षांपर्यंत नाटक पाहिलें नव्हतें, असें म्हणतात. नाटकें सर्वच वाईट असें माझें म्हणणें नाहीं. परंतु सन्मार्गाला नेणारीं व उदात्त विचार ज्यांत प्रधान आहेत अशीं थोडींच. बहुतेक शृंगाररसपूर्णच जास्त. म्हणून विद्यार्थिदशेंत किंवा त्यापुढील आयुष्यांत सुद्धां मनाची चलबिचल होईल अशा प्रकारचीं नाटकें न पाहण्याचा क्रम ठेवावा. वास्तविक आपलें आचरण कसें निर्दोष असावें! विद्वत्तेची कल्पना म्हणजे काय तर समुद्रासारखी गंभीर वृत्ति व्हावी. इतरांच्यापेक्षां आपण श्रेष्ठ असें मानण्याकडे व वर्चस्व संपादण्याकडे कल नसावा. थोर पुरुषांचीं उदाहरणें नित्य दृष्टीसमोर ठेवावीं. कित्येकजण म्हणतात कीं, ग्रॅज्युएटामध्यें व्यावहारिक ज्ञानाचा अभाव दिसून येतो. असल्या आक्षेपास आपण

जागा ठेवूं नये. विद्यार्थिदशा संपल्यावर शक्य तितक प्रवास करावा व एरव्हींही सृष्टि व तिचीं बालकें यांचें सूक्ष्म निरीक्षण करून चतुरस्रता संपादन करावी. आपणांत जी धमक राहील त्या मानानें सत्कृत्यें आपल्या हातून घडतील. हल्लीं विद्वत्तेच्या दृष्टीनें ग्रॅज्युएटांची जी योग्यता २५ वर्षांमागें होती तशी नाहीं, याचें कारण काय बरें असावें ? एखादेच न्यायमूर्ति रानडे किंवा नामदार गोखले कां निपजावे ? जास्त कां निपजूं नयेत ? वास्तविक ज्ञानाकरितां शिकावयाचें आहे. कॉलेज सोडलें कीं, दिली पुस्तकांना रजा, असें उपयोगाचें नाहीं. जे युनिव्हर्सिटींत चमकतात अशा पदवीधरांना कांहीं वर्षांनीं एखादा प्रश्न आला तर ते आपले कोरे, असें होऊं नये. ग्रंथवाचनाचा व्यासंग व निदिध्यास सारखा चालू पाहिजे. वास्तविक कॉलेज सोडल्यावर खऱ्या विद्यार्थिदशेला प्रारंभ होणार आहे. या जगाच्या रंगभूमीवर किती तरी महत्कार्यें आपणांस करावयाचीं आहेत. आपल्या देशाकरितां स्वार्थत्याग करावयाचा आहे, उन्नति साधावयाची आहे. पुष्कळांची समजूत आहे कीं, विद्या हें चरितार्थाचें साधन आहे, नौकरीकरितां शिकावयाचें, परंतु तसें नाहीं. एका दृष्टीनें तें असलें तरी मनुष्यास आयुष्यभर विद्यार्थिदशा असावी. उत्तम विषयांचा व्यासंग सदैव चालू ठेवावा. अशाल्याचे रा. ब. महाजनी यांची योग्यता आपणांस माही-

तच आहे. भावि पिढीच्या शिक्षणाची जबाबदारी आपणां-वरच आहे. हें कॉलेज म्हणजे आपली पवित्र अशी माता आहे. या उपमेइतकी दुसरी कोणतीच सुंदर उपमा शिक्षणसंस्थेला नाहीं. आईचें मुलांविषयींचें प्रेम निरपेक्ष असतें म्हणून मुलांवर तिचें ऋण जास्त आणि तें फेड-ण्याची जबाबदारीही मुलांच्यावर त्याच मानानें वाढते. कॉलेज व विद्यार्थी यांची गोष्ट तशीच आहे. दोन्ही ठिकाणीं जगाचा अनुभव पाहिला तर सारखाच. स्वार्थ-त्यागी व पुत्रवत्सल अशा माताच जास्त आढळतात, ति-तकीं मातृभक्त मुलें सांपडत नाहींत. कॉलेज आणि शिष्य–वर्ग यांनाही तोच नियम लावला म्हणजे शिक्षण वाढेल तसतशी मातृभक्तांच्या संख्येंतही भरच पडली पा-हिजे. मातृस्वरूपी कॉलेजांतील आपण मुलें म्हणजे खरो-खर बंधूंप्रमाणें आहांत, म्हणून आपणांत निर्मल बंधुप्रेम असून या संस्थेचा पहिल्या प्रतीचा अभिमान आपण बाळ-गिला पाहिजे. एकी होण्यास प्रेमबंधन अगदीं दृढ पा-हिजे. दुराग्रहास पेटून दुफळी होऊं देऊं नये. एवढ्या मर्यादित मंडळींत जर प्रेम राहिलें नाहीं तर राष्ट्रीय उ-न्नति आपल्या हातून कशी साधली जाईल ? परक्यांशीं प्रसंग येईल तेथें एकजुटीनें आपण आपल्याठायीं वसत असलेल्या अभिमानाचें पाणी दाखविण्यास तयार असलें पाहिजे. अलीकडे कित्येक तरुणांची प्रवृत्ति सर्वस्वी

युरोपियन बनण्याकडे असल्यामुळें जात ओळखण्याची पंचाईत पडूं लागली आहे. कारण संभाषण व्हावयाचें तें इंग्लिशमध्यें. त्यामुळेंही जातीबद्दल बोध होण्यास साधन नाहीं. ब्राह्मण, सिंधी, पारशी, मुसलमान बेंगाली, गुजराथी सर्वच सारखे दिसतात. तेव्हां पाश्चिमात्य पोषाख जरी सोईचा वाटला तरी प्रत्येकानें शिरोभूषणांत तरी राष्ट्रीयत्व कायम ठेवण्याचा कृतनिश्चय केला पाहिजे.

या पाठशाळेंत आपणांस जन्म घालवावयाचा नाहीं, हें तर निश्चित आहे; परंतु जगाच्या मोठ्या पाठशाळेंत आपणांस प्रवेश करावयाचा आहे, त्यांत संसारांत पडल्या-वर नानाप्रकारचे प्रसंग यावयाचे आहेत. त्यांतून पार कसें पडावें, म्हणून कित्येक वेळां अंतःकरणाची त्रस्तता अनुभवास येणार आहे. तऱ्हेतऱ्हेच्या लोकांशीं प्रसंग येतील.. त्यांत चांगलें कोण व वाईट कोण यांची निवड बरेच वेळां चुकेल. कॉलेजांतील मित्र हे जन्मभर मित्र रहाणार आहेत असें नाहीं. हे कधीं काळीं योगायोगानें दृष्टीस पडावयाचे व भेटावयाचे. आपणांस वाटतें सर्वच गोड बोलणारे तेवढे मित्र; परंतु कित्येक स्वार्थसाधु व आपमतलबी असतात ते आपला कार्यभाग उरकला कीं यःपलायन करतात. कोणी कोणी संपत्तीच्या दिवसांत स्नेही ह्मणवितात; विपत्ति आली कीं, वाऱ्यासही उभे रहावयाचे नाहींत. कित्येक नीतिभ्रष्ट करण्यांत तरबेज असतात. ते

दुर्मार्गाकडे वळवितात; त्यांच्या नादीं लागलें कीं, आयुष्याची होळी झालीच. मग सुखाचा किरणसुद्धां प्राप्त व्हावयाचा नाहीं. कित्येक मित्र म्हणवून फशीं पाडणारे 'परोक्षे कार्यहंतारं प्रत्यक्षे प्रियवादिन ' या कोटींतले असतात. प्रायः मनुष्याची परीक्षा तो ज्या मंडळींत उठतो बसतो, जी त्याची मित्रमंडळी असते, त्यांच्यावरून करतात. त्यामुळें ताडीच्या झाडाखालीं बसून दूध प्राशन केल्याप्रमाणें मन कितीही शुद्ध असलें तरी चालत नाहीं. वास्तविक सहवासाचा परिणाम मनुष्यावर होतोच, हा नियम आहे. 'पुष्पसंगें मातीस वास लागे। मृत्तिकेचा पुष्पांत गुण न वागे ॥ ' असा सत्संगतीचा महिमा आहे. तथापि मृत्तिकेचा पुष्पाशीं संबंध घडला तर फुलांचा सुवास कांहीं तरी कमी झालाच पाहिजे. म्हणून मित्र संपादन करणें फार जोखमीचें आहे. मनुष्याची पारख चांगलीच झाली पाहिजे. कित्येक वेळां आपण सरळ बोलतों किंवा सरळ रीतीनें वागतों असें आपणांस वाटतें व आपली सदसद्विवेकबुद्धिही तसेंच सांगते, परंतु त्याचा अर्थ जगांत विपरीत होण्याचा संभव असतो.

कित्येक मित्र फार चांगले असतात. त्यांचा रहस्यस्फोट आपल्या हातून केव्हांही होऊं देऊं नका. त्यांच्याशीं एकानिष्ठेनें वागा. एकदां स्नेह जडला कीं तो वास्तविक तुटूं नये. दोन मित्रांपैकीं एक जर दुर्जन असला तर

उपाय नाहीं. परंतु दोघे सज्जन असतील तर त्यांचा प्रणय संबंध आजन्म टिकलाच पाहिजे. शेक्सपियरनें म्हटलें आहे:-

" सुपरीक्षित जो असे मित्र त्या, घट्ट प्रेमरशनांहीं ॥
आंवळूनियां हृदयीं ठेवी रत्न तयासम नाहीं ॥ १ ॥"

बाकी अस्सल स्नेही जगांत विरळाच. त्यांची वाणी व करणी अंतःकरणपूर्वक असावयाची. त्यांना पराकाष्ठेची कळकळ व जीवाला जीव द्यावयाला तयार असे ते असतात. ते स्वतः आपल्यापासून गौप्य ठेवावयाचे नाहींत व आपणही त्यांच्यापासून ठेवूं नये; परंतु दृढ मैत्री ठेवावी. असले मित्र अक्षयी जवळ करावे व त्यांना सदैव साह्य करावें. स्नेह्यास्नेह्यांचें जें प्रेमपरिपूर्ण संभाषण चालतें तें " म्लानस्य जीवकुसुमस्य विकासनानि " या योग्यतेचें असतें. तथापि मित्रामित्रांनीं कधीं वादाच्या भरीस पडावयाचें नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. नाहींतर त्यामुळें प्रेमभंग होऊन स्नेहांत व्यत्यय यावयाचा. सख्याला नेहमीं समानशीलत्वाची जरूर असते—जसें तेलपाणी एकत्र केलें तर भिन्न भिन्न दिसतें; व दूधपाणी मिसळल्यास अक्षयीं एकजीव होऊन रहातें. कोणालाही एकांतवास व मित्रविरहित आयुष्य आवडत नाहीं. आपल्या प्रेमाला विभागी कोणी तरी लागतोच—परंतु गीतेंत सांगितल्याप्रमाणें अनुद्वेगकर, सत्य, प्रिय आणि हितकर असेच शब्द बोलण्याचा प्रत्येकाचा निश्चय

असावा. कित्येक वेळां मधल्या माणसांच्या चहाडखोर-पणामुळेंसुद्धां स्नेहभंग होतो. अशा वेळीं मन एकदम प्रक्षुब्ध होऊं न देतां सारासारविचार करून शांत व स्थिर चित्तानें सत्य व असत्य यांची निवड करावी. संशयी व मत्सरी यांच्याशीं कदापिही मैत्री करूं नये. आपण ज्याला मित्र म्हणणार तो निर्मळ मनाचा व विश्वासपात्र असा असला तरच त्याच्याशीं स्नेह करावा. नाहीं तर आपला विश्वासघात झाला असतांना आपल्यास जें दुःख होतें तें अपरिमित होय! सन्मित्र वास्तविक चिंतामणीप्रमाणें, तो जोडणें अवश्य आहे. परंतु सर्वांना तो मिळण्याइतके ते भाग्यवान् नसतात. असो.

सामाजिक कर्तव्यासंबंधीं विचार करूं. ज्या समाजांत मनुष्यप्राणी जन्मास येतो त्यासाठीं त्याचीं विविध प्रकारचीं कर्तव्यें आहेत. हा देह आपल्या कार्यासाठींच केवळ नसून लोकांच्या हितार्थही त्याचा उपयोग केला पाहिजे. 'आला आला प्राणि जन्मासि आला। गेला गेला बापुडा व्यर्थ गेला' असें आपल्या जन्माचें होऊं नये. इतरांच्या उपयोगा-करितां आपला देह झिजला पाहिजे. स्वतःच्या गरजा सर्वजण भागवितात. स्वतःच्या सुखार्थ सर्वांचाच प्रयत्न असतो. परंतु इतरांचें दुःख हरण करीन, इतरांच्या उप-योगीं पडेन, समाजांतील व्यंगें, अनिष्ट चाली नष्ट करीन, आपल्या समाजास उच्चतम अवस्था प्राप्त करून देऊन त्याची

उन्नति साधीन असा मनाचा निर्धार पाहिजे. अशी ज्याची वृत्ति असेल, तोच खरा मनुष्य व त्याचेंच जन्मास आल्याचें सार्थक्य होतें. सामाजिक सुधारणेस आपल्या हातून मदत व्हावी अशी इच्छा असेल त्यानें उच्चनीच भावाचा त्याग केला पाहिजे. मनुष्यप्राणी येथून तेथून सारखा. कमी जास्त कोणी नाहीं. त्याच्याविषयीं समान भाव जागृत पाहिजे. दासांनीं ह्मटलेलेंच आहे कीं " जें जें आपणांसी ठावें । तें तें इतरांसि शिकवावें । शहाणे करूनि सोडावे । सकळ जन " या नरदेहाची इतिकर्तव्यता म्हणजे देह त्यागितां कीर्ति मागें उरावी ' अशी आहे. आपल्या चिरवियोगामुळें जितक्या जास्त लोकांना वाईट वाटेल तितकी आपली लोकप्रियता जास्त! आपल्यामुळें आपल्या बंधूभगिनींची उन्नति साधावयाची हेंच आपलें ध्येय ठेवून आपल्या उपयुक्ततेचा परिघ वाढविला पाहिजे. आजकाल आमच्या समाजांतील व्यंगेंच नुसतीं नष्ट करावयाचीं म्हटलीं तरी किती स्वार्थत्यागी तरुणांची जरूर आहे ! 'सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी,' ' सेवासदन, ' ' अनाथबालिकाश्रम, ' ' महिलाविद्यालय ' आदिकरून संस्था किती उपयुक्त काम करीत आहेत, हें आपणांस माहीतच आहे.

आतां राजकीय कर्तव्य पाहूं:—आपण प्रजाजन या नात्यानें सार्वभौम सरकारशीं अत्यंत राजनिष्ठ असलें

पाहिजे. आपला विचार, उच्चार, व आचार यांत इतका मेळ असला पाहिजे कीं, आपल्याविषयीं यत्किंचितही शंका घेण्यास कोणासही कारण राहूं नये. प्रायः ज्या प्रकारचीं वर्तमानपत्रें विद्यार्थ्यांच्या हातीं पडतात त्या प्रकारचीं त्यांचीं मतें बनतात. म्हणून प्रागतिक—ज्यांत विचारांचा निर्दोषपणा आहे, अशींच वर्तमानपत्रें वाचण्याकडे प्रवृत्ति ठेवावी. विद्यार्थिदशेंत राजकीय विषयांसंबंधीं आपलीं मतें ठाम ठरवून ठेवूं नयेत. काळ व परिस्थिति यांस अनुसरून तीं असावीं. साधक बाधक प्रमाणांचा शांतपणानें विचार करण्याची संवय ठेवावी. केव्हां केव्हां पित्याचीं मतें प्रागतिक तर पुत्राचीं मतें जहाल अशा प्रकारची चमत्कारिक परिस्थिति उत्पन्न होते. ती जनदृष्टीस तरी किती विलक्षण वाटते ! म्हणून कोणत्याही प्रकारच्या अशा विचारांस मनांत थारा न देतां कायेनें, वाचेनें व मनानेंही आपण राजनिष्ठ रहाल असा मला पूर्ण भरंवसा आहे.

आतांपर्यंत जो विचार झाला तो ऐहिक गोष्टींविषयीं झाला. पारमार्थिक बाबींसंबंधीं आपण कांहींच विचार केला नाहीं. वास्तविक आयुष्यांतील परमश्रेष्ठ कर्तव्य तेंच आहे. तें जर बजाविलें नाहीं तर ' नोळखे कदा जो आपुलिया पित्या । सार्थक तें जित्या काय त्याचें ॥ १ ॥' अशी स्थिति होईल. सर्व प्रकारचीं सुखें मिळत

आहेत परंतु तीं दिलीं कोणीं ? आपणांस उत्पन्न केलें कोणीं ? पुढें आपल्यास कोठें जावयाचें ? याबद्दल मुळींच विचार केला नाहीं, तर मोठाच कर्तव्यच्युतीचा दोष आपणांवर येईल. हा नरदेह अत्यंत अमूल्य आहे. यांत आयुष्याचें सार्थक झालेंच पाहिजे. साधुसंतांनीं म्हटल्याप्रमाणें:—

" धन्य धन्य हा नरदेहो । येथील अपूर्वता पहाहो ।
जो जो कीजे परमार्थ लाहो । तो तो कार्य सिद्धी ॥ "

विद्येचा खरा उपयोग तरी कोणता आहे ? या जगांत जें कांहीं आपलें कर्तव्य आहे त्यांत ती विद्या किती उपयोगी पडेल हें पाहून आपणांस संपादावयाचें काय तें पाहिलें पाहिजे. ईश्वरसिद्धि किंवा आपली आध्यात्मिक उन्नति हीच साधणें आहे. ज्या विद्येमुळें मनोभावांचा विकास होत नाहीं, अशुद्धता विराम पावत नाहीं, ती विद्या असली किंवा नसली सारखीच! 'काय ग्रंथ पढोन । एका ब्रह्मज्ञानावांचोन ' असें होतें. आपलें जीवित क्षणभंगुर आहे. या अल्पायुष्यामध्येंच आपल्यास मोठी सिद्धि प्राप्त करून घ्यावयाची आहे. प्रस्तुतची स्थिति पाहिली तर विद्येचा उपयोग अशा रीतीनें फारच थोडा होतो आहे. वास्तविक जुनेंही नाहीं व नवेंही नाहीं अशी अवस्था आहे. संध्येसही फांटा मिळाला व परमेश्वराचें शुद्धस्वरूप जाणण्याकडेही कल नाहीं, मग उन्नति कशी साधणार ?

कोणी कांहीं ह्मटलें तर वाद व्हावयाचा. स्पेन्सर असें ह्मणतो, बर्गसन तसें ह्मणतो वगैरे. कोणी मानमान्यतेसाठीं, कोणी मोठ्या चाकरीच्या लोभानें, कोणी अर्थार्जन जास्त होण्याच्या लालसेनें जर धर्माची कांस धरूं लागले तर अंतःकरणावर प्रकाश काय पडणार? खरी भक्ति व तळमळ मनास पाहिजे. मग ईश्वरोपासनेची तऱ्हा कोणतीही असो. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे एवढेंच कीं, 'अंतरीं सबाह्य सारिखा निर्मळ' अशी वृत्ति ठेवून 'जे कां रंजले गांजले। त्यासि म्हणे जो आपुले॥ तोचि साधु ओळखावा। देव तेथेंचि जाणावा'॥ या अभंगांत सांगितल्याप्रमाणें ईश्वरसेवा साधावी.

शेवटीं आपणांस एवढीच विनंति आहे कीं, ज्या जगन्नियंत्यानें जन्मास घालून आपणांवर विविध प्रकारच्या जबाबदाऱ्या टाकल्या आहेत, त्याचें विस्मरण न होऊं देतां, सदसद्विवेक बुद्धीला अनुसरून, आपलें कर्तव्य योग्यप्रकारें बजावून आणि आयुष्य सुखमय करण्याचा प्रयत्न करावा. कुटुंब या शब्दाचा परिघ वाढवून, जनसेवेचें व्रत उचलून जगांत धन्य धन्य म्हणवून घ्या! तो जगदात्मा आपलें सदैव मंगल करो, हीच आकांक्षा प्रदर्शित करून मी आपली रजा घेतें.

---

